राज्यातील शासकीय/जिल्हा परिषद/पंचायत समित्या मधील वर्ग-३ व वर्ग-४ ची खुल्या प्रवर्गातील पदे भरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र.अकंपा-१००३/प्र.क्र.५१/२००३/आठ,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक:३० जानेवारी,२००४

वाचा:-
१) शासन निर्णय,नियोजन विभाग,क्रमांक:हसका-१३९४/प्र.क्र.१८५/रोहयो-३,दि.१ डिसेंबर,१९९५
२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र:असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर,२००१
३) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र:एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२,दि. १० मार्च,२००३
४) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२.दि. १ ऑगस्ट,२००३
५) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२,दि.३० ऑक्टोबर,२००३
६) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभागक्र.अकंपा-१००३/प्र.क्र.२५/२००३/आठ,दि.१३ जून,२००३
७) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र:संकीर्ण-१००३/प्र.क्र.९६/२००३/१३-अ, दि.१९ नोव्हेंबर,२००३.
८) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/२००३/१२,दि.२ डिसेंबर,२००३

## परिपत्रक

मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांनी एलपीए-८३/२००३ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक १० मार्च,२००३ च्या परिपत्रकानुसार राज्यातील हजेरी सहाय्यकांचे शासकीय, जिल्हा परिषद तसेच पंचायत समित्यांतील पदांवर समावेशन पूर्ण होईपर्यंत वर्ग-३ व वर्ग-४ ची अतांत्रिक पदे भरण्यास स्थगिती देण्यात आली होती. हजेरी सहाय्यकांचे असे समावेशन संदर्भाधीन क्रमांक १ येथील नियोजन विभागाच्या दिनांक १ डिसेंबर,१९९५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करावयाचे होते.

संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक १ ऑगस्ट,२००३ च्या परिपत्रकान्वये मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांच्या निदेशानुसार मागासवर्गीयांचा अनुशेष भरुन काढण्याकरिता मागासवर्गीय हजेरी सहाय्यकांनंतर अनुकंपा, स्वातंत्र्य सैनिकांचे पाल्य, प्रकल्पग्रस्त, अंशकालीन कर्मचारी यांच्या सूचीतील मागासवर्गीय उमेदवारांच्या नियुक्त्या करण्याबाबत निदेश देण्यात आले होते.

तद्नंतर संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक ३० ऑक्टोबर,२००३ च्या परिपत्रकाव्दारे रोजगार हमी योजनेतील खुल्या तसेच मागासवर्गीय हजेरी सहाय्यकांचे शासन, जिल्हा परिषदा तसेच पंचायत समित्यांच्या सेवेतील वर्ग-३ व वर्ग-४ चे पदांवर समावेशन करण्यासंबंधी सुस्पष्ट सूचना देण्यात आलेल्या

रोटा प्रिंट/एच–1063(7000–1–04)1

आहेत. मागासवर्गीय सर्व हजेरी सहाय्यकांचे समावेशन झाल्याची माहिती उपलब्ध झाली असून, खुल्या प्रवर्गातील हजेरी सहाय्यकांचे समावेशन करण्याची प्रक्रिया अद्याप चालू आहे.

२. मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने दिलेल्या निर्देशानुसार सर्व हजेरी सहाय्यकांचे समावेशन पूर्ण होईपर्यंत खुल्या प्रवर्गातील इतर कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या करता येत नसल्याने शासकीय कार्यालये/जिल्हा परिषद तसेच पंचायत समित्यांतील सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांनी पदांच्या आढाव्यानंतर उच्चस्तर सचिव समितीने तयार केलेल्या आकृतिबंधातील वर्ग-३ व वर्ग-४ ची रिक्त पदे प्राथम्याने हजेरी सहाय्यकांच्या समावेशनाने भरणे आवश्यक आहे. **याप्रकारे मागासवर्गीय तसेच खुल्या प्रवर्गातील सर्व हजेरी सहाय्यकांचे शासकीय/जिल्हा परिषद तसेच पंचायत समित्यातील वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदांवर समावेशन पूर्ण झाल्यावर खुल्या प्रवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यासंबंधी शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे:-**

१) संदर्भाधीन क्रमांक ५ येथील दिनांक ३० ऑक्टोबर,२००३ च्या परिपत्रकानुसार दिलेल्या सूचनांचे पालन करुन खुल्या तसेच मागासवर्गीय सर्व हजेरी सहाय्यकांचे समावेशन झाल्यानंतर संदर्भाधीन क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या दिनांक १० सप्टेंबर,२००१ च्या आदेशानुसार पदांचा आढावा होवून उच्चस्तर सचिव समितीने मंजूर केलेल्या आकृतिबंधाच्या मर्यादेतील वर्ग-३ व वर्ग-४ ची खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे प्रथम वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीने भरण्यात यावीत.

२) अतिरिक्त संवर्गात पात्र व योग्य उमेदवार उपलब्ध नसल्याचे ना हरकत प्रमाणपत्र वित्त विभागाकडून प्राप्त झाल्यानंतर खुल्या प्रवर्गातील उर्वरित रिक्त पदे खाली नमूद केलेल्या प्राथम्य क्रमानुसार त्या त्या प्रवर्गाच्या उमेदवारांमधून विहित कार्यपध्दतीचे पालन करुन भरता येतील.

अ) अनुकंपा तत्वावरील नियुक्तीच्या प्रतीक्षा सूचीतील उमेदवार
ब) जनगणना कर्मचारी
क) अंशकालीन पदवीधर कर्मचारी
ड) प्रकल्पग्रस्त.

वरील प्राथम्य क्रमानुसार अर्हता व पात्रता धारण करणाऱ्या उमेदवारांची भरती करतांना त्या त्या प्रवर्गासाठी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन कटाक्षाने करावे तसेच त्यासाठी विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा. त्यानुसार संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे/सक्षम प्राधिकाऱ्यांकडे उमेदवारांची सुस्पष्ट मागणी नोंदवावी आणि उमेदवार उपलब्ध होताच त्यांची तातडीने नियुक्ती करावी.

३. हजेरी सहाय्यक आणि त्यानंतर अतिरिक्त संवर्गातील उमेदवारानंतर अनुकंपा तत्वावरील उमेदवारांच्या प्राथम्याने नियुक्त्या करावयाच्या असल्याने संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दिनांक १३ जून,२००३ च्या शासन निर्णयातील अनुकंपा धारकांच्या नियुक्तीकरिता जी ५ टक्के पदाची मर्यादा विहित केली होती ती मर्यादा आता रद्द करण्यात येत आहे. त्यामुळे उपलब्ध रिक्त पदे अनुकंपा तत्वावरील उमेदवारांच्या नियुक्तीने भरण्यास कोणतीही मर्यादा राहणार नाही.

४. संदर्भाधीन क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या दिनांक १० सप्टेंबर,२००१ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार पदांचा आढावा पूर्ण होवून उच्चस्तर सचिव समितीकडून आकृतिबंध निश्चित झालेल्या कार्यालये/विभागातील आकृतिबंधानुसार रिक्त पदे भरण्यासाठी पुन्हा शासनाची मान्यता घेण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यामुळे संबंधित नियुक्ती अधिकारी मंजूर आकृतिबंधाच्या मर्यादेतील वर्ग-३ व

वर्ग-४ ची रिक्त पदे वरील परिच्छेदातील निदेशानुसार संबंधित प्राधिकाऱ्यांकडे मागणी करुन भरु शकतील.

५. वरील परिच्छेद १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सर्व हजेरी सहाय्यकांचे समावेशन पूर्ण झाल्यावर तसेच परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अतिरिक्त संवर्ग आणि इतर प्रवर्गात नियुक्तीसाठी अर्हताधारक पात्र उमेदवार उपलब्ध नसल्यास वर्ग-३ व वर्ग-४ ची अशी पदे खुल्या स्पर्धेतून भरण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक ७ येथील दिनांक १९ नोव्हेंबर,२००३ च्या आदेशातील निदेशांप्रमाणे कार्यवाही करावी.

६. **सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांनी वरील सुचनांचे काटेकोर पालन करुन त्यांचेकडील रिक्त पदांवर सर्व प्रथम सर्व हजेरी सहाय्यकांना सामावून घ्यावे त्यानंतर अतिरिक्त संवर्ग; अनुकंपा, जनगणना कर्मचारी, अंशकालीन कर्मचारी याप्रमाणे सुयोग्य खुल्या प्रवर्गातील उमेदवारांच्या नियुक्त्या कराव्यात. मात्र हजेरी सहाय्यकांचे समावेशन पूर्ण झाल्याशिवाय इतर प्रवर्गातील उमेदवारांच्या नियुक्त्या करता येणार नाहीत.त्यामुळे मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाच्या निर्देशांची अवमानना होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी..**

७. सर्व विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उपरोक्त निदेश त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून देवून या निदेशांचे काटेकोर पालन होत असल्याची खात्री करावी.

८. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२९/०४/विसु-१,दिनांक १६ जानेवारी,२००४ अनुसार दिलेल्या सहमतिनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

प्र. कृ. लोखंडे
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,मुंबई,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,